

महाराष्ट्र शासन
विधि व न्याय विभाग
**शासन ज्ञापन क्र. सानुग्र-२०२१/८९०/प्र.क्र.१४१/कार्यासन -६**
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २३ जून, २०२३.

विषय :- **कै.श्री. सुधीर केशवराव चव्हाण, लिपिक-टंकलेखक, मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई यांचा कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर शासन आदेशानुसार कोवीड-१९ संबंधित कामकाज करण्याचे कर्तव्य बजावत असताना कोव्हीड-१९ संसर्गाने मृत्यु झाल्यामुळे त्यांच्या कुटूंबियांना रु.५० लक्ष सानुग्रह सहाय्य मंजूरीबाबत.**

संदर्भ :-१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक १४.०५.२०२१.
२) वित्त विभागाचे पत्र क्र.न्यायप्र-२०२०/सं.क्र.४/व्यय-९, दिनांक २८.०१.२०२१
३) सहाय्यक प्रबंधक, ( निरीक्षण) मुंबई उच्च न्यायालय यांचे पत्र क्र:ब(जन)-१००१/ २०२२/१०८०, दिनांक १५.०६.२०२२
४) सहाय्यक प्रबंधक, ( निरीक्षण) मुंबई उच्च न्यायालय यांचे पत्र क्र:ब(जन)- १००१/२०२२/१७३४, दिनांक १४.०९.२०२२
५) मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई यांचे पत्र जावक क्र. १६४४/२०२१, दिनांक १८.०९.२०२१
६) मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई यांचे पत्र जावक क्र. १२४९/२०२२, दिनांक ०९.०६.२०२२
७) मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई यांचे पत्र जावक क्र. ८७८/२०२३, दिनांक २७.०४.२०२३
८) श्रीमती ज्योत्सना सुधीर चव्हाण यांचा मुख्य महानगर दंडाधिकारी यांना सादर केलेला दिनांक २४.०५.२०२१ रोजीचा विनंती अर्ज.
९) श्रीमती कमलाबाई केशवराव चव्हाण यांचा मुख्य महानगर दंडाधिकारी यांना सादर केलेला दिनांक २०.०४.२०२३ रोजीचा विनंती अर्ज.

**ज्ञापन :-**

मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई यांच्या बेलार्ड पियर न्यायालयीन केंद्रातील महानगर दंडाधिकारी, ३८ वे न्यायालय, मुंबई येथे कार्यरत असलेले कै.श्री. सुधीर केशवराव चव्हाण, लिपिक-टंकलेखक, हे कोव्हीड -१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर कर्तव्य व जबाबदारी पार पाडताना त्यांचा कोरोना विषाणू संसर्गाने दिनांक १४.०४.२०२१ रोजी मृत्यू झाला आहे.

२. मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई यांनी उक्त मृत लिपिक-टंकलेखक कै.श्री. सुधीर केशवराव चव्हाण, यांच्या कुटूंबियांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० अनुसार रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. प्रभारी मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई यांनी कै. श्री.सुधीर केशवराव चव्हाण यांना ओमकार हॉस्पीटल, कल्याण, जिल्हा ठाणे येथे दाखल करण्यापूर्वी १४ दिवसांच्या काळात ते कार्यालयात कर्तव्यावर हजर होते असे प्रमाणपत्र सादर केले आहे.

४. ओमकार हॉस्पीटल, कल्याण, जिल्हा ठाणे यांनी कै. श्री. सुधीर केशवराव चव्हाण यांचा मृत्यू हा कोविड-१९ या रोगाच्या संसर्गामुळे झालेला असल्याचे **वैद्यकीय प्रमाणपत्रामध्ये** नमुद केले आहे.

५. उप रजिस्ट्रार (जन्म व मृत्यू) कल्याण डोंबिवली महानगरपालिका, कल्याण, जिल्हा ठाणे यांनी कै.श्री.चव्हाण यांचा मृत्यू हा दिनांक १४.०४.२०२१ रोजी झालेला असल्याचे **मृत्यू प्रमाणपत्र** दिले आहे.

६. मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई यांनी त्यांच्या दिनांक १८.०९.२०२१ आणि दिनांक २७.०४.२०२३ रोजीच्या पत्रामध्ये कै.श्री. सुधीर केशवराव चव्हाण यांच्या **पत्नी** श्रीमती ज्योत्सना सुधीर चव्हाण आणि कै.श्री. सुधीर केशवराव चव्हाण यांच्या **आई** श्रीमती कमलबाई केशवराव चव्हाण यांनी मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लनेड, मुंबई यांच्याकडे दिनांक २०.०४.२०२३ रोजीच्या पत्रान्वये रु.५०.०० लक्ष सानुग्रह अनुदान मिळण्याबाबतचा **विनंती अर्ज** मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लनेड, मुंबई यांना सादर केला आहे.

७. उपरोक्त बाबी लक्षात घेता, मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लनेड, मुंबई यांच्या बेलार्ड पियर न्यायालयीन केंद्रातील महानगर दंडाधिकारी, ३८ वे न्यायालय, मुंबई येथे कार्यरत असलेले लिपिक-टंकलेखक कै.श्री.सुधीर केशवराव चव्हाण यांच्या कुटुंबियांना कै.श्री.चव्हाण यांनी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या (NPS) अर्जात त्यांची पत्नी श्रीमती ज्योत्सना सुधीर चव्हाण यांना ५०% व आई श्रीमती कमलबाई केशवराव चव्हाण यांना ५०% नामनिर्देशन केलेले असल्याने, त्यांची पत्नी श्रीमती ज्योत्सना सुधीर चव्हाण यांना ५०% प्रमाणे रुपये २५,००,०००/- व आई श्रीमती कमलबाई केशवराव चव्हाण यांना ५०% प्रमाणे रुपये २५,००,०००/- असे एकूण रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) सानुग्रह सहाय्य म्हणून **प्रदान** करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

८. उक्त खर्च "मागणी क्रमांक जे-१, मुख्य लेखाशीर्ष २०१४-न्यायदान, १०७, इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये (००)(००)(०१) इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये (अनिवार्य) (२०१४०२३४) या लेखाशिर्षाखालील १३-कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील अनुदानातून भागविण्यात यावा.

९. सदर ज्ञापन वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९/०५/२०२० व दिनांक १४/०५/२०२१ तसेच वित्त विभागाचे पत्र क्र. न्यायप्र-२०२०/सं.क्र.४/व्यय-९, दिनांक २८.०१.२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०६२३१५१५२१३९१२ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GIRISH RAMLING SAGANE

Digitally signed by GIRISH RAMLING SAGANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8a9b5d43113d71f5bfc96922b7f43ac6c2848591ed3e1f34019d8b33a3cdb267, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=17189CF8C13CB2294570F54627B6E879FDC09820CCBF3380ED23DA0258EA27C8, cn=GIRISH RAMLING SAGANE
Date: 2023.06.23 15:16:57 +05'30'

**( गि. रा. सगणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई

**प्रत आवश्यक कार्यवाहीस्तव -**

१) सहाय्यक प्रबंधक ( निरीक्षण), मुंबई उच्च न्यायालय, मुंबई-४०० ०३२.
२) अतिरिक्त मुख्य महानगर दंडाधिकारी ३८ वे न्यायालय, बेलार्ड पिअर, मुंबई
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.

५) श्रीमती ज्योत्सना सुधीर चव्हाण, रुम नं.४, चाळ नं.२ए, नवशिव कृपा सोसायटी, चिकणघर, सह्याद्रीनगर, बिर्ला स्कूल रोड, कल्याण (पश्चिम), जिल्हा ठाणे-४२१३०१

६) श्रीमती कमलबाई केशवराव चव्हाण, मु.पो.तिवसा (आनंद नगर), तालुका जिल्हा यवतमाळ, पिनकोड-४४५२०१

७) निवडनस्ती, कार्यासन-६.